भरवि गुणामृताचे सर्वां जीवा सन्मति घांस. ४८९
यमुनातटवासिद्विजवृंदें परम उपद्रव कथिला,
शत्रुघ्नें लवणासुर समरीं प्रभुच्या तेजें मथिला. ४९०
कोटित्रय गंधर्व हि भरतें न उठायासि निजविले,
ज्या मत्ताहीं गल्ल जनाचे, रीति त्यजुनि, भिजविले. ४९१
प्रकृतिकथा किति? धर्मन्यायें बहु निवविं श्वानातें,
प्रभुचें तोका जेंवि पित्याचें दे शिव विश्वा नातें. ४९२
प्रभु हयमेध करी त्यांत रची जांबूनदकनकाची
जनकाची कन्या, देखति जे न म्हणति ते जन काची. ४९३
श्रीरामचरित त्या हयमेधीं गाती कुश लव दोघे,
प्रभु हि म्हणे, 'कर्णयुगा! सर्व ज्ञाता कुशल वदो, घे.' ४९४
वाल्मीकिच्छात्र स्वसुत असें निजसारूप्यें कळलें,
वळलें प्रभुचें मन अपवादें जें वरि होतें मळलें. ४९५
आदिकवि श्रीवाल्मीकि म्हणे, 'त्यजली कां हे शुद्धा?
कैसें होतें साध्वी होती जरि या त्यागें क्रुद्धा?' ४९६
राम म्हणे, 'स्वामी! हें जाणें, त्यजिली अपवादानें;
करवा दिव्य, पुन्हा इष्टाच्या सुरतरु लपवा दानें.' ४९७
श्री वदली, 'जें व्रत न विटविलें जरि माते! महि! म्यां तें,
घे पोटीं, गावुत, जाणति जे गरिमा, ते महिम्यातें.' ४९८
ऐसें सांजलि सीता वदली, तों चि वसुमती चिरली,
चिर लीला गाया विश्वें ती तीमाजि सती शिरली. ४९९
कोपे प्रभु धरणीवरि, तत्वस्मरण करुनि दे धाता,
'ताता! तूं विष्णु, श्री सीता त्रैलोक्याची माता.' ५००
अभिषेकुनि आठां पुत्रांतें दिधलीं राज्यें आठ,

१. प्रजेची गोष्ट कशाला? २. सुवर्णविशेषाची. ३. कच्ची न=खरीखुरी जानकी.
४. ज्ञाता वदो [ कीं ] 'कर्णयुगा! सर्व कुशल घे.' ५. मोठेपणा.

पाठ पुरविते सवारीची[1], ज्यां श्रुतिशास्त्रें पाठ. ५०१

द्विजशिशु उठवी, तुरवी कोठें वार्ता अन्यायाची,
धन्या याची रीति, न कोणी याचक अन्या याची[2]. ५०२

सर्व प्रजा विमानकोटिनीं संतानकलोकातें,
शोकातें वारुनि, ने, सुखवी तात जसा तोकातें. ५०३

स्वजनत्राण कराया ठेवी भक्तसुचिरजीवि[3] वर,
कीर्ति हि, कळिस न दे, देवुनियां सौख्य रुचिर, जी विवर[4]. ५०४

( गीतिवृत्त )

रामात्मजें मयूरें श्रीरामपदांसि हात जोडून,
'रामायणपंचशती' वाहिलि सप्रेम वचकें सोडून. ५०५

इति श्रीरामनंदनमयूरविरचिता श्रीरामायणपंचशती संपूर्णा ।

---



१. सोडलेला पाठ—सर्वारीचे. २. प्रार्थी—पंत. ३. भक्तांला चिरंजीव करणारा राम. ४. भय.